राज्यात दुध उत्पादनास चालना देण्यासाठी ०६/०४/०२ दुधाळ संकरीत गायी/ म्हशींचे गट वाटप करणे या नाविन्यपुर्ण राज्यस्तरीय सर्वसाधारण, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी उपयोजनेंर्तगत योजनेस प्रशासकीय मंजुरी प्रदान करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

### कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**पूरक शासन निर्णय क्रमांकः राज्ययो-२०१२/प्र.क्र.१५९/पदुम-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९ जानेवारी, २०१९.

संदर्भ : - कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग शासन निर्णय क्रमांकः राज्ययो- २०१२/ प्र.क्र. १५९ /पदुम-४, दि. ३०.१०.२०१५

**प्रस्तावना :-**

संदर्भित शासन निर्णय दि.३०.१०.२०१५ द्वारे राज्यात दुध उत्पादनास चालना देण्यासाठी सहा/चार/दोन दुधाळ संकरीत गाई / म्हशींचे गट वाटप करणे या नाविन्यपूर्ण राज्यस्तरीय सर्वसाधारण, अनुसूचित जाती उपयोजना व जिल्हास्तरीय आदिवासी क्षेत्र उपयोजनांचे यापूर्वीचे शासन निर्णय अधिक्रमित करून प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत वाटप करावयाच्या दुधाळ जनावरांमध्ये देशी जातीच्या दुधाळ गाईंचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यात दुग्धोत्पादनास चालना देण्यासाठी राज्यस्तरीय सर्वसाधारण, अनुसूचित जाती उपयोजना व जिल्हास्तरीय आदिवासी क्षेत्र उपयोजनेअंतर्गत वाटप करावयाच्या सहा/चार/दोन संकरीत गाई/ म्हशींचे गट वाटप करणे या योजनेमध्ये **देशी दुधाळ गाईंचा (गीर, सहिवाल, रेड सिंधी, राठी, थारपारकर देवणी, लाल कंधारी, गवळाऊ व डांगी)** समावेश करण्यास याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

वाचा येथील दि.३०.१०.२०१५ च्या शासन निर्णयातील पृ.क्र.२ वरील योजनेच्या अंमलबजावणीबाबत सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना - अटी व शर्तीमधील अ.क्र.१० खालीलप्रमाणे वाचण्यात यावे.

**१०.** या योजनेअंतर्गत वाटप करावयाच्या दुधाळ संकरित गाई जसे की, एचएफ, जर्सी (प्रतिदिन १० ते १२ लि. दुध उत्पादन क्षमता), देशी दुधाळ गाई जसे की, गीर, सहिवाल, रेड सिंधी, राठी, थारपारकर (प्रतिदिन ८ ते १० लि. दुध उत्पादन क्षमता) देवणी, लाल कंधारी, गवळाऊ व डांगी (प्रतिदिन ५ ते ७ लि. दूध उत्पादन क्षमता) आणि

सुधारीत मु-हा व जाफराबादी म्हशी (प्रतिदिन८ ते १० लि. दुध उत्पादन क्षमता) दुस-या / तिस-या वेतातील असाव्यात. दुधाळ गाई व म्हशी शक्यतो १ ते २ महिन्यापूर्वी व्यायलेल्या असाव्यात.

सदर पूरक शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१६४६४०३३०१ असा आहे. हा पूरक शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2019.01.19 16:50:58 +05'30'

**( अनूप कुमार )**
**शासनाचे प्रधान सचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य
५. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांचे मध्यवर्ती कार्यालय
६. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
९. मुख्य सचिवांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सचिव, महिला व बाल कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई
१५. सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे ७.
१७. जिल्हाधिकारी (सर्व),
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१९. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, (सर्व).
२०. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त (सर्व)
२१. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२३. निवड नस्ती पदुम-४.